महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास "१३ कार्यालयीन खर्च" आणि "११-देशांतर्गत प्रवास खर्च" या उद्दीष्टासाठी वर्ष २०१९-२० साठी अनुदान वितरित करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बियुडी २०१९/प्र.क्र.६१/का-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ०३.१२.२०१९.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०१९/प्रक्र.४४/अर्थ-३, दि.०१एप्रिल, २०१९
२) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक: अविवि- २०१९/प्रक्र.१४/का-७, दि.०९ एप्रिल, २०१९
३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक:बियुडी २०१९/प्रक्र.६१/का-४, दि.२० एप्रिल, २०१९
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०१९/प्रक्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९
५) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक: क्रमांक: अविवि- २०१९/प्रक्र.१४/का-७, दि.२३ जुलै, २०१९
६) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक:बियुडी २०१९/प्रक्र.६१/का-४, दि.०७ ऑगस्ट, २०१९
७) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांचे पत्र, क्रमांक: २०१९/ म.रा.वक्फ.न्या./आस्था/३५९/, दि.०२.०७, २०१९

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी "१३-कार्यालयीन खर्च" आणि "११ प्रवास खर्च" या उद्दीष्टासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून शिल्लक असलेले ८०% अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दीष्टासाठी रु.८,२२,०००/- (रुपये आठ लाख बावीस हजार मात्र) तसेच "११ प्रवास खर्च" या उद्दीष्टासाठी रु.३६,०००/- (रुपये छत्तीस हजार मात्र) इतके अनिवार्य खर्चासाठी अनुदान मंजूर आहे. संदर्भ क्र.१ व २ येथील परिपत्रकान्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये "१३ कार्यालयीन खर्च" या उद्दीष्टासाठी रु.२,७४,००० /- इतकी आणि "११ प्रवास खर्च" या उद्दीष्टासाठी रु.१२,०००/- तसेच तद्नंतर संदर्भ क्र.४ व ५ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये"१३ कार्यालयीन खर्च" या उद्दीष्टासाठी रु.२,१९,२००/- इतकी आणि "११ प्रवास खर्च" या उद्दीष्टासाठी रु.९,६००/- इतके अनुदान वितरित करण्यात आले आहे. आता अध्यक्ष/पीठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण यांनी संदर्भ क्र.७ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार तसेच वित्त

विभागाने ८०% च्या मर्यादेत राहून दिलेल्या दिलेल्या मान्यतेस अनुसरुन “१३-कार्यालयीन खर्च” या उद्दीष्टासाठी रु.१,६४,४००/- आणि “११ प्रवास खर्च”या उद्दीष्टासाठी रु.७,२००/- असे एकूण रु.१,७१,६००/- (रुपये एक लाख एकाहत्तर हजार सहाशे मात्र) इतके अनुदान अध्यक्ष/पीठासीन अधिकारी, महाराट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. पीठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

उपरोक्त खर्च “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८), “१३-कार्यालयीन खर्च व “११-प्रवास खर्च” “अनिवार्य” या लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.२६०/२०१९/व्यय-१, दि.२६.११.२०१९ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०३१२३७१२०७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2019.12.03 13:00:24 +05'30'

**( म. स. चौकेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग
२. अध्यक्ष/पीठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद,
३. जिल्हाधिकारी, औरंगाबाद,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
५. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
७. उपसचिव (व्यय-१/अर्थ-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. कार्यासन अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.